**ग्रामीण रुग्णालय, पोलादपुर, जिल्हा-रायगड येथील रुग्णालय व निवासस्थान इमारतीच्या दुरुस्तीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा २०१५/ प्रक्र-२६१/आरोग्य ३(अ)**
गो.ते.रुग्णालय संकुल इमारत, ए विंग, १० वा मजला,
मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
दिनांक: ११.०९.२०१५.

वाचा :-

१) **सह.संचालक,आरोग्य सेवा , रुग्णालये ( राज्यस्तर)मुंबई यांचे पत्र क्र. संआसे/ कक्ष -३/ टे-६/ग्रारुपोलादपूर मुइवनिवादुरु/६५८३-८४/१५, दिनांक-०९.०६.२०१५**

प्रस्तावना :-

संदर्भाधीन पत्रान्वये ग्रामीण रुग्णालय, पोलादपूर, जिल्हा-रायगड येथील रुग्णालय इमारतीचे व निवासस्थान इमारतीच्या दुरुस्तीच्या अनुक्रमे रु.१९,२५,०७७/-(रुपये एकोणीस लक्ष पंचवीस हजार सत्यात्तर फक्त ) व रु.१०,६८,४४९/-(रुपये दहा लक्ष अडुसष्ट हजार चारशे एकोणपन्नास फक्त ) इतक्या रकमेचे अंदाजपत्रक व आराखडे आरोग्य सेवा संचालनालयातर्फे सादर करण्यात आले आहेत. सदर अंदाजपत्रक सन २०१४-१५ च्या दरसूचीवर आधारीत असून कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, महाड यांनी प्रमाणित केले आहे. ग्रामीण रुग्णालय पोलादपूर, जिल्हा-रायगड येथील रुग्णालय इमारतीची व निवासस्थानाचे दुरुस्ती करणे बाबतचा सदर प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता.

**शासन निर्णय:-**

आता या शासन निर्णयान्वये ग्रामीण रुग्णालय, पोलादपुर, जिल्हा-रायगड येथील रुग्णालय इमारतीचे व कर्मचारी निवासस्थान इमारतीच्या दुरुस्तीच्या अनुक्रमे रु.१९,०४,०००/-(रुपये एकोणीस लक्ष चार हजार फक्त ) व रु.१०,५७,०००/-(रुपये दहा लक्ष सत्तावन्न हजार फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रक व आराखडयांना खालील विवरणपत्रात नमुद केल्याप्रमाणे आणि त्याखाली नमुद केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| sr.no | Description | Amount |
|---|---|---|
| 1 | Repairs to main Building at Rural Hospital, Poladpur, Dist-Raigad | Rs.15,88,190.00 |
| 2 | Add Electrification Charges 11% | Rs. 174701.00 |
| 3 | Add Contingencies Charges 4% | Rs.70515.64 |
| 4 | Add Cent age Charges 4% | Rs.70515.64 |
| | Total | **Rs.19,03922.28** |
| | Say Total | **Rs.19,04,000/-** |

| sr.no | Description | Amount |
|---|---|---|
| 1 | Repairs to Medical Officer Quarter at Rural Hospital, Poladpur, Dist-Raigad | Rs.8,81,471.00 |
| 2 | Add Electrification Charges 11% | Rs.96,962.00 |
| 3 | Add Contingencies Charges 4% | Rs.39,137.32 |
| 4 | Add Cent age Charges 4% | Rs.39,137.32 |
| | Total | **Rs.10,56,707.64** |
| | Say Total | **Rs.10,57,000/-** |

अ) काम सुरु करण्यापूर्वी सदर अंदाजपत्रक सा.बां.विभागाचे संबधित मुख्य अभियंता यांच्याकडून साक्षांकित करुन घ्यावे.

ब) कामासाठीच्या जागेची उपलब्धता, योग्यता व जागा पुरेशी आहे किंवा नाही याबाबतची खात्री आरोग्य संस्था प्रमुख यांनी करावी.

क) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्टया मान्यता ही सार्वजनिक बांधकाम खात्याच्या त्या- त्या क्षेत्राच्या सक्षम अधिका-याकडून करण्यात यावी. अशी तांत्रिक मान्यता करीत असताना आरोग्य खात्याच्या त्या त्या आरोग्य सेवा मंडळाच्या उपसंचालकांच्या सहमतीने तरतूदी अंतीम करण्यात याव्यात.

ड) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग , शासन निर्णय क्र. इएनव्ही- २०१३ /प्र.क्र. १७७/तां.क. १ दि. १० जानेवारी,२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

सदर बांधकामावरील खर्च खालील लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा.

**लेखाशिर्ष:-**

४२१०- वैद्यकीय सेवा. व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च.

०२- ग्रामीण आरोग्य सेवा

०४ - सार्वजनिक आरोग्य

१०४- सामुहीक आरोग्य केंद्र

(००) (०१)- मोठी बांधकामे

हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. अनौप ३३८ / इमा -३ दि. ०१/०९/२०१५ अन्वये प्राप्त सहमतीने आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक - विअप्र -१००८ / प्र.क्र. ७०/२००८/ विनीयम, दिनांक १५ मे २००९ सोबतच्या परिशिष्ट भाग- पहिला उपविभाग - पाच मधील अनुक्रमांक-१,परिच्छेद क्रमांक १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहेत .

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१५०९१११७२५४०२०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shubha Anil Gadre

Digitally signed by Shubha Anil Gadre
DN: CN = Shubha Anil Gadre, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.09.11 18:22:15 +05'30'

**(शु.अ.गद्रे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. संचालक ,आरोग्य सेवा, मुंबई.
२. अति.संचालक रुग्णालये ( राज्यस्तर ) , आरोग्य सेवा, मुंबई.
३. उपसंचालक , आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे
४. जिल्हा शल्य चिकीत्सक , रायगड, अलिबाग .
५. उपविभागीय अभियंता , सा.बां . प्रादेशिक विभाग, पोलादपूर.
६. कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग,महाड
७. महालेखापाल १/२ महाराष्ट्र ( लेखा व लेखापरिक्षा )/ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपुर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड
९. सा.बां.वि/ (इमा-३), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. वित्त विभाग, (विनीयम कार्यासन / कोषा -५ /अर्थसंकल्प) मुंबई.
११. अवर सचिव (अर्थसंकल्प) सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय , मुंबई.
१२. निवडनस्ती.